सार्वजनिक आरोग्य विभागातील महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ (वेतनस्तर एस-२३ व त्यावरील) आणि सामान्य राज्य सेवा, गट-अ (वेतनस्तर एस-२० व त्यावरील) मधील अधिकारी यांचे वयाच्या ५०/५५ व्या वर्षापलिकडे किंवा अर्हताकारी सेवेच्या ३० वर्षानंतर सेवा पुनर्विलोकनाकरीता "विभागीय पुनर्विलोकन समिती" व अभिवेदनावर विचार करण्याकरीता "विभागीय अभिवेदन समिती" गठीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः समिती-२०२०/प्र.क्र.२७/सेवा २**

गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, १० वा मजला

मंत्रालय, मुंबई ४०० ००१.

दिनांक : २० फेब्रुवारी,२०२०

**संदर्भ** - शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.एलपीएल-२०१७/प्र.क्र.२१/का.पंधरा, दि.१०.०६.२०१९.

## प्रस्तावना -

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ च्या नियम १०(४) व नियम ६५ मधील तरतुदीनुसार अधिकारी / कर्मचारी यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षापलीकडे किंवा अर्हताकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण झाल्यानंतर त्यांचे सेवा पुनर्विलोकन करण्याकरीता सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधीन दि.१०.०६.२०१९ च्या शासन निर्णयान्वये एकत्रित कार्यपद्धती विहित केलेली आहे. सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार, आरोग्य सेवा आयुक्तालयांतर्गत महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील जिल्हा शल्य चिकित्सक संवर्ग, जिल्हा आरोग्य अधिकारी संवर्ग, विशेषज्ञ संवर्ग व त्यावरील वरिष्ठ पदावर कार्यरत अधिकारी (वेतन मॅट्रीक्समधील वेतन स्तर एस-२३ : ६७७००-२०८७०० व त्यावरील) आणि सामान्य राज्य सेवा, गट-अ मधील कार्यरत अधिकारी (वेतन मॅट्रीक्समधील वेतन स्तर एस-२० : ५६१००-१७७५०० व त्यावरील) यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षापलीकडे किंवा अर्हताकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण झाल्यानंतर त्यांची सेवा पुढे चालू ठेवण्याची पात्रापात्रता आजमावण्यासाठी "विभागीय पुनर्विलोकन समिती" व अभिवेदनावर विचार करण्याकरीता "विभागीय अभिवेदन समिती" गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय -

आरोग्य सेवा आयुक्तालयांतर्गत महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील जिल्हा शल्य चिकित्सक संवर्ग, जिल्हा आरोग्य अधिकारी संवर्ग, विशेषज्ञ संवर्ग व त्यावरील वरिष्ठ पदावर कार्यरत अधिकारी (वेतन मॅट्रीक्समधील वेतन स्तर एस-२३ : ६७७००-२०८७०० व त्यावरील) आणि सामान्य राज्य सेवा, गट-अ मधील कार्यरत अधिकारी (वेतन मॅट्रीक्समधील वेतन स्तर एस-२० : ५६१००-१७७५०० व त्यावरील) यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकारी सेवा यापैकी जे अगोदर घडेल त्यावेळी त्यांची सेवा पुढे चालू ठेवण्याची पात्रापात्रता आजमाविण्यासाठी विहित निकषांच्या आधारे त्यांचे सेवा पुनर्विलोकन करण्याकरीता खालीलप्रमाणे "विभागीय पुनर्विलोकन समिती" गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| (१) | सचिव/ प्रधान सचिव/ अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई. | अध्यक्ष |
| (२) | सह / उप सचिव (सेवा-२), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| (३) | मा. अध्यक्षांनी नामनिर्देशित केलेले विभागातील सह / उप सचिव. | सदस्य |
| (४) | अवर सचिव (सेवा-२), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य सचिव |

२. आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई हे विभागातील संबंधीत अधिकाऱ्यांच्या सेवा पुनर्विलोकनासंबंधीचा प्रस्ताव शासनास सादर करतील. सदर समिती त्यांच्या शिफारशी अंतिम निर्णयासाठी समुचित प्राधिकाऱ्यांना सादर करतील. तसेच, विभागीय पुनर्विलोकन समितीच्या शिफारशीनुसार जे अधिकारी सेवेत चालू राहण्यास निर्विवादपणे अपात्र ठरणार असतील अशा अधिकाऱ्यांचे पुनर्विलोकन शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग दि.१०.०६.२०१९ मध्ये नमूद सामान्य प्रशासन विभागाच्या "विशेष पुनर्विलोकन समिती" कडून करण्यात येईल.

३. सेवा पुनर्विलोकनाअंती सेवा पुढे चालू ठेवण्यास निर्विवादपणे अपात्र ठरलेल्या नोटीस बजावण्यात आलेल्या अधिकारी यांच्या अभिवेदनावर विचार करण्याकरीता शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग दि.१०.०६.२०१९ मधील तरतुदीनुसार "विभागीय अभिवेदन समिती" गठीत करण्यात येत आहे-

**अ)** महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील (वरिष्ठ वेतनश्रेणी) वेतनमॅट्रीक्समधील वेतनस्तर एस-२५ ते एस-२९ मधील अधिकाऱ्यांसाठी शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग दि.१०.०६.२०१९ नुसार "आस्थापना मंडळ क्र.०२" ही अभिवेदन समिती असेल.

**ब)** महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा आरोग्य अधिकारी व विशेषज्ञ संवर्गातील वेतनमॅट्रीक्समधील वेतनस्तर एस-२३ ते एस-२४ मधील अधिकाऱ्यांसाठी आणि सामान्य राज्य सेवा, गट-अ मधील वेतनस्तर एस-२० ते एस-२४ मधील अधिकाऱ्यांसाठी पुढीलप्रमाणे "विभागीय अभिवेदन समिती" गठीत करण्यात येत आहे –

| | | |
|---|---|---|
| (१) | सचिव/ प्रधान सचिव/ अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई. | अध्यक्ष |
| (२) | मा. अध्यक्षांनी नामनिर्देशित केलेले विभागातील सह / उप सचिव. | सदस्य |
| (३) | मा. अध्यक्षांनी नामनिर्देशित केलेले विभागातील अवर सचिव . | सदस्य सचिव |

(टिप - अ.क्र.(२) व (३) येथील अधिकारी हे विभागीय पुनर्विलोकन समितीमधील अधिकाऱ्यांव्यतिरिक्त असावेत.)

४. विभागीय अभिवेदन समिती त्यांच्या शिफारशी अंतिम निर्णयासाठी समुचित प्राधिकाऱ्यांना सादर करील.

५. सेवा पुनर्विलोकनासंबंधातील कार्यवाही सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दि.१०.०६.२०१९ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या कार्यपद्धती व सूचनांनुसार करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२२०११३०३६९३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vishnudas Pundlikrao Ghodke

Digitally signed by Vishnudas Pundlikrao Ghodke
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=514c2e5ad6ac71c69b99a86a5fe5189556b7a95d5896bbb81496f403bb58ac3e, serialNumber=9ab69d6945f8950a9525831f8ae9726be295d17576e78d19fa8f6cb952bb04a0, cn=Vishnudas Pundlikrao Ghodke
Date: 2020.02.20 12:23:23 +05'30'

**(वि.पुं.घोडके)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा. मंत्री (सा.आ.वि.)/मा. राज्यमंत्री (सा.आ.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव (सा.आ.वि.) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४) संचालक, आरोग्य सेवा(१), आरोग्य सेवा आयुक्तालय, आरोग्य भवन, मुंबई.
५) संचालक, आरोग्य सेवा (२), आरोग्य सेवा आयुक्तालय, पुणे.
६) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७) महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
८) सहसंचालक, आरोग्य सेवा (सर्व).
९) उपसंचालक, आरोग्य सेवा मंडळे (सर्व)
१०) सहसचिव (सेवा-२), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) सर्व संबंधीत समिती सदस्य.
१२) निवडनस्ती.